अधिसंख्य पदावरील नियुक्तीला
मुदतवाढ देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : एमव्हीडी-०४१९/प्र.क्र. १३०/परि-३**
२ रा मजला,मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १० डिसेंबर,२०२१

वाचा : १) गृह विभाग, शासन निर्णय, क्र. एमव्हीडी-०४१९/प्र.क्र. १३०/परि-३, दि. २४.११.२०२०
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र. बीबीसी २०१८/प्र.क्र ३०८/१६-ब, दि. २८.१०.२०२१

**प्रस्तावना :**

गृह विभाग यांच्या दिनांक २४.११.२०२० रोजीच्या शासन निर्णयातील परिशिष्ट-अ येथे मोटार वाहन विभागातील मोटार वाहन निरीक्षक, सहायक मोटार वाहन निरीक्षक, मुख्य लिपिक, वरिष्ठ लिपिक, कनिष्ठ लेखापरिक्षक, कनिष्ठ लिपिक, लिपिक-टंकलेखक, शिपाई व वाहन चालक यांच्या अधिसंख्य पदावरील नियुक्तीला देण्यात आलेली ११ महिन्यांची मुदतवाढ दि. २३.११.२०२१ रोजी संपुष्टात आली आहे.

आता सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दि. २८.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये अधिसंख्य पदावरील नियुक्त्यांना त्यांच्या अधिसंख्य पदावरील ११ महिन्यांचा कालावधी संपुष्टात आल्यानंतर पुढील ११ महिने किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत किंवा याविषयी शासनाने स्थापन केलेल्या अभ्यास गटाच्या शिफारशी शासनास प्राप्त होऊन त्यावर शासनाचे अंतिम निर्णय होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. सामान्य प्रशासन विभागाच्या सदर शासन निर्णयातील सुचना विचारात घेऊन संदर्भ क्र. १ येथील दिनांक २४.११.२०२० रोजीच्या शासन निर्णयातील परिशिष्ट-अ येथे नमूद परिवहन आयुक्त कार्यालयाच्या आस्थापनेवरील अधिसंख्य पदावरील नियुक्त्यांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

दिनांक २४.११.२०२० रोजीच्या शासन निर्णयातील परिशिष्ट-अ येथे मोटार वाहन विभागातील मोटार वाहन निरीक्षक, सहायक मोटार वाहन निरीक्षक, मुख्य लिपिक, वरिष्ठ लिपिक, कनिष्ठ लेखापरिक्षक, कनिष्ठ लिपिक, लिपिक-टंकलेखक, शिपाई व वाहन चालक

यांच्या अधिसंख्य पदावरील नियुक्तीला त्यांच्या अधिसंख्य पदावरील कालावधी संपुष्टात आल्यानंतर पुढील पुढील ११ महिने किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत किंवा याविषयी शासनाने स्थापन केलेल्या अभ्यास गटाच्या शिफारशी शासनास प्राप्त होऊन त्यावर शासनाचे अंतिम निर्णय होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. अधिसंख्य पदांच्या वेतनावर येणारा खर्च हा संबंधित अधिकारी/कर्मचारी सध्या ज्या कार्यालयात कार्यरत, त्या कार्यालयाच्या वेतनासंबंधितच्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्र.२ येथील दिनांक २८.१०.२०२१ च्या शासन निर्णयास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२१०१५२५०१४६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

DEEPAK UTTAMRAO POKALE

Digitally signed by DEEPAK UTTAMRAO POKALE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=856b31c793b12e4f22cb247c5cff7f3358867f2482aa2234f6131bf8940dbd2e, serialNumber=f4163205e7b4960cc7ca6f973d6deb06502b2e8fc47a411babcf42a0e99cf34b, cn=DEEPAK UTTAMRAO POKALE
Date: 2021.12.10 15:25:57 +05'30'

**(दिपक पोकळे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
५. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
६. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. उप सचिव (१६-ब), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई व सर्व संबधित कोषागार अधिकारी (परिवहन आयुक्त कार्यालयामार्फत)
९. कक्ष अधिकारी (आपुक), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती, परि-३